# थोरांचा थोरपणा.



करून घावा लागता,

लेखकः—

## कृष्णराव भाऊराव बाबर.

एज्यु० सुपरवायझर डि. लो. बोर्ड सातारा.





नवीन किताबखाना, पुणे सिटी.

आवृत्ति ३ री ] [ प्रती २ हजार.

मार्च १९३१

किंमत २ आणे.

# प्रस्तावना.



नेहमींच्या रूढीप्रमाणें प्रस्तावना-लेखकास प्रस्तावना लिहितांना लेखकाचा वाचकांशीं परिचय करून द्यावा लागतो, व पुस्तकांतील विषयांची थोडक्यांत माहिती करून द्यावी लागते. यांपैकीं पहिलें जें काम-लेखकाशीं परिचय करून देणें, तें माझे स्नेही रा. कृ. भा. बाबर हे सुप्रसिद्ध लेखक असल्यामुळें अर्थातूच उरलें नाहीं.

रा. बाबर यांचे लेख ज्यांनीं वाचले असतील त्यांना त्यांच्या भाषेंतील सोपेपणा, सहज समजेल अशी विचारसरणी आणि नवीन काळाला पटणारे उदात्त भावनेचे विचार या गोष्टी आढळून आल्या असतील. प्रस्तुत पुस्तक-थोरांचा थोरपणा-हें लहान मुलांकरितां लिहिलेलें असून याचा शिक्षक व विद्यार्थी या दोहोंनाही नीतिपाठाचे धडे शिकतांना व शिकवितांना उपयोग होण्यासारखा आहे.

ता० ७-७-२४
२२ वेताळ, पुणें.



मा. ग. शेटे.

---

## तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

दुसऱ्या आवृत्तींत कांहीं फरक न करतां ही आवृत्ती छापून काढिली आहे. पुस्तक लोकप्रिय झालेलें पाहून समाधान वाटतें.

सच्चिदानंद, भुवन शिराळें
(सातारा)
२२-३-३१ इ.; रा. श. २५७



कृ. भा. बाबर
एज्यु० सुप० डि. लो. बोर्ड, सातारा.

# अनुक्रमणिका.





---

# मीपणाची कल्पना गेली पाहिजे.



[ १ ]

श्री स्वामी विवेकानंदांचे गुरु परमहंस स्वामी रामकृष्ण हे एक गोष्ट सांगत असत. ते म्हणत, "वांसरूं जन्मल्यापासून मीपणा धरून वागत असतें. मीपणा म्हणजे स्वतःबद्दल फाजील अभिमान. मी इतरांहून थोर आहें, किंवा मी सर्व कांहीं करतों, अशा घमेंडीनें वागणें आणि परमेश्वरास विसरून जाणें म्हणजे मीपणानें वागणें होय. असो. वांसरूं जन्मतांच 'हम्मा' 'हम्मा' म्हणून ओरडत असतें. हम्मा हम्मा म्हणजे 'अहं' 'अहं' किंवा 'मी' 'मी' याशिवाय दुसरें काय ? या मीपणाचा परिणाम काय होतो पहा. जन्मल्यापासून लवकरच त्याच्या गळ्यास दावें लागतें ! लोक त्याला बांधून टाकतात आणि जरा तें मोठें झालें कीं, त्यास औताला जुंपून त्याजकडून काबाडकष्ट करून घेतात. वेळप्रसंगीं त्याला चाबकानें फोडूनही काढतात, त्याची रग जिरविण्यासाठीं त्याला बडवितातही ! सारांश, त्याच्या मीपणाचें फळ त्याला भरपूर मिळतें. पण एवढयानेंच भागत नाहीं. तें मेल्यानंतर त्याच्या कातडयालाही त्रास देण्यास लोक विसरत नाहींत. त्याच्या कातडयाचे जोडे करून पायांत घालतात; तें नगाऱ्यास लावून त्यास बडवीत असतात; आणि त्याची बारीक तांत करून पिंजारी, लोंकर पिंजण्यासाठीं त्यावर ठोके मारीत असतात. इतकें झाल्यावर मात्र त्याची मीपणाची कल्पना पार मावळून जाते आणि मग तें पिंजाऱ्याचे ठोके बसत असतां 'तुंहि' 'तुंहि' असा आवाज करूं लागतें. 'तुंहि' 'तुंहि' म्हणजेच 'त्वं' 'त्वं' किंवा 'तूं' 'तूं' हें होय. देवा, 'मी' सर्वसमर्थ नाहीं; बाबा, तूंच रे सर्व कर्ता करविता आहेस, असें आतां तें म्हणत असतें आणि

इतकें झाल्यावर मात्र त्याची सुटका होते ! स्वामी रामकृष्ण हे साधुपुरुष होते. ते 'बोले तैसा चाले' या धोरणानें वागणारे होते. त्यांना ही गोष्ट सांगण्याचा अधिकार प्राप्त झालेला होता. त्यांनीं स्वतःचा मीपणा नाहींसा केलेला होता. आपण थोर आहों ही घमेंड राहूं नये म्हणून ते लहानपणीं पहांटे उठून लोकांचे शौचकूप झाडून येत असत ! शौचकूप झाडण्यांतही ज्यांना कमीपणा वाटत नाहीं त्यांच्यांत मीपणा कशाला राहील ? याच स्वामी रामकृष्णांस भगवान् रामकृष्ण म्हणून सारें जग वंदन करीत आहे.

---

## माझा धंदा शेतकी व विणकाम हा आहे.



[ २ ]

हिंदुस्थानचे एक प्रसिद्ध पुढारी महात्मा गांधी यांना एकदां कांहीं कारणामुळें कोर्टापुढें साक्ष देण्याचा प्रसंग आला असतां, न्यायमूर्तींकडून नेहमींच्या त्यांच्या वहिवाटीप्रमाणें तुमचा धंदा काय म्हणून विचारण्यांत आलें. तेव्हां महात्माजींनीं माझा धंदा शेतकी व विणकाम हा आहे असें सांगितलें. महात्मा गांधी हे विलायतेंत राहून बॅरिस्टरीची परीक्षा देऊन आलेले व बरेच दिवस उत्तम रीतीनें वकिली केलेले आणि थोर घराण्यांतील गृहस्थ असल्यामुळें न्यायमूर्तींना आश्चर्य वाटलें व तुम्ही बॅरिस्टर अहां ना ? असें त्यांना पुन्हा विचारण्यांत आलें तरी गांधीजींनीं पुन्हा पूर्ववतच उत्तर दिलें.

आपली योग्यता मोठी नसतांना ती तशी आहे हें दाखविण्याकडेच सर्व लोकांचा कल असतो. घरची स्थिति कितीही हलाखीची असो, तरी मी थोर व श्रीमंत आहें हें दाखविण्याचीच हौस बहुतेकांना असते.

हल्लीं शेतकरी वर्ग अशिक्षित व दरिद्री असल्यामुळें शेतकरी लोकांसही आपण शेतकरी आहों असें सांगण्याची लाज वाटत असते ! अशा वेळीं हिंदुस्थानच्या एका सर्वमान्य व विद्वान् पुढाऱ्यानें मी ' शेतकरी ' किंवा ' विणकरी ' आहें म्हणून सांगणें खरोखर आश्चर्यकारक आहे. शिवाय महात्माजींची घरची स्थिति फार चांगली आहे. त्यांचे वडील काठेवाडांतील एका संस्थानचे २३ वर्षें दिवाण होते.

पण थोरांचा थोरपणा यांतच दिसून येतो. त्यांना एकादा धंदा हलका आहे असें वाटतच नाहीं. प्रामाणिकपणानें व कर्तव्य म्हणून कोणताही धंदा करणें मोठेपणाचें असतें हें त्यांना माहीत असतें. महात्मा गांधींनीं दक्षिण आफ्रिकेंत अटकेंत असतां पुष्कळ वेळां आपल्या लोकांचे शौचकूप झाडून स्वच्छ केलेले आहेत.

---

# आपल्यासाठीं दुसऱ्यास त्रास देणें बरें नाहीं !



[ ३ ]

बंगाल्यांतील एक प्रसिद्ध साधु नागमहाशय हे प्रवासास निघाले म्हणजे कधीं बैलगाडींतून प्रवास करीत नसत. बैलगाडींतून प्रवास करूं लागल्यावर गाडीवान बैलांस खूप बडवून काढतात किंवा वरचेवर चाबूक हाणीत असतात हें नागमहाशयांना आवडत नसे. बैलांना हाणलेलें पाहून त्यांना कळवळा येत असे. लोक त्यांची समजूत करण्याचा यत्न करीत कीं, ' बैलांना खावयास भरपूर घालून त्यांजकडून काम घेण्यास काय हरकत आहे ? ' नागमहाशय म्हणत, ' त्यांचे शक्तीप्रमाणें त्यांजकडून योग्य काम करून घेण्यास हरकत नाहीं. पण आपल्यासाठीं दुसऱ्यांना

त्रास देणें बरें नाहीं. मुक्या जनावरांना बडवून काढणें बरें आहे काय ? एकदां श्रीसाधु नागमहाशय यांना त्यांचे गांवाहून कलकत्त्यास नेण्यासाठीं त्यांस एका भक्तानें बैलगाडी आणली; पण ते तींत बसून येण्यास कांहीं तयार होईनात. अखेर बैलांना मुळींच हाणावयाचें नाहीं असें कबूल केल्यावर मग ते त्या गाडींतून कलकत्त्यास गेले.

महात्मा गांधींनाही आपल्यासाठीं दुसऱ्यास त्रास देणें बरें वाटत नाहीं. त्यांचीही एक अशीच गोष्ट प्रसिद्ध आहे. एकदां ते सुमारें २० मैल अंतरावर असलेल्या गांवीं बैलगाडीनें जाण्यास निघाले. निम्या वाटेंत गेल्यावर लवकर चालण्यासाठीं गाडीवानानें बैलास चाबूक मारला. त्याबरोबर गांधीजींना इतकें वाईट वाटलें कीं, ते लगेच त्या गाडींतून खालीं उतरले व त्या बैलास आपल्यासाठीं त्रास झाला म्हणून आपण शिक्षा भोगण्याचें ठरवून परत निघाल्या ठिकाणीं ते पायानें चालत आले आणि पुन्हा फिरून चालत जाऊन आपल्या ठरलेल्या ठिकाणीं जाऊन पोहोंचले ! आतां ते बैलगाडींतून कधींही बसतच नाहींत ! थोरपणा सहज मिळत नाहीं. त्याचेसाठीं असली तपश्चर्या व्हावी लागते. आज महात्माजी जगांतील सर्वांत थोर मनुष्य म्हणून प्रसिद्ध आहेत, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

---

# पोटचा गोळा बळी दिला !



[ १ ]

श्री संभाजीमहाराजांचा वध करून औरंगजेब बादशहानें महाराष्ट्रांत धुमाकूळ मांडला; व रायगड काबीज करून संभाजीमहाराजांची बायको व मुलगा यांना कैद करून नेलें, त्यावेळीं महाराष्ट्रावर मोठें संकट गुद-

रलें. संभाजीमहाराजांचे बंधु राजाराम–महाराज यांनाही पकडण्याचा औरंगजेबाचा विचार असल्यामुळें महाराष्ट्र–देश सोडून कर्नाटकांत मद्रासकडे जिंजीस जाण्याचा विचार राजाराम–महाराजांनीं केला आणि त्याप्रमाणें सन १६९२ मध्यें ते तिकडे गेले. त्यावेळीं त्यांचेबरोबर जे विश्वासू व जिवास जीव देणारे लोक गेले होते, त्यांत खंडोबल्लाळ चिटणीस हे प्रमुख होते. जिंजीस जातांना वाटेंत बंगलोर एथें त्यांस शत्रूकडून अतोनात त्रास सोसावा लागला. पुढें जिंजीस गेल्यावर पुन्हा राजाराम–महाराजांना धरणें आलें व जिंजीस वेढा पडला. वेढा ६ वर्षें होता. आता या संकटांतून त्यांची सुटका कशी करावी याचा मराठे मंडळास विचार पडला. त्या वेळीं मोंगलांच्या नोकरीस असलेल्या शिर्के नांवाच्या मराठा सरदारास खंडोबल्लाळ चिटणीस यांनीं कोंकणांत आपणाकडे असलेली सर्व जहागीर लिहून दिली व त्याचे मार्फत महाराजांची सुटका केली. महाराजांना एका रस्त्यानें लावून देऊन आपण दुसऱ्या रस्त्यानें येत असतां, पुन्हा खंडोबल्लाळास मोंगलांनीं कर्नाटकांत पकडलें व कैदेंत ठेवलें. पुढें थोड्याच दिवसांत त्यास कडेलोट करून मारण्याचा बेत निश्चित झाला होता. राष्ट्रभक्त खंडोबल्लाळ मरणास भ्याला नाहीं. पण राजाराम–महाराजांना मदत करून महाराष्ट्र पुन्हा स्वतंत्र करण्याची पुण्यश्लोक शिवाजी–महाराजांचें नांव राखण्याची आपली इच्छा अपुरी राहाते म्हणून त्यास वाईट वाटूं लागलें. नंतर त्या चतुर पुरुषानें तुरुंगावरील एका मराठा पहारेकऱ्यास वश करून घेऊन महाराष्ट्रांत बातमी पाठवून आपला मुलगा बहिरो यास बोलावून घेतलें व त्या पहारेकऱ्याच्या संमतीनेंच आपल्या मुलास आपल्या जागीं बसवून आपली सुटका करून घेतली व महाराष्ट्रांत जाऊन आपली इच्छा पूर्ण केली. पुढें ठरलेल्या दिवशीं खंडोबल्लाळ समजूनच त्याच्या पुत्राचा कडेलोट करण्यांत आला ! देशासाठीं खंडोबल्लाळानें आपला पोटचा गोळा बळी दिला ! पूर्वी संभाजी–महाराजांनीं खंडोबल्लाळाचे बापास हालहाल करून मारलें होतें;

पण तें विसरून राष्ट्रकार्यास त्यानें अशी मदत केली ! थोरांचा थोरपणा हा असा असतो.

---

# ते माझ्या मजुरीचे पैसे आहेत !

[ ५ ]

महात्मा गांधी ज्यांना आपले गुरु समजतात ते कौंट टॉलस्टॉय हे रशियांतील एक साधु व विद्वान् गृहस्थ होते. महात्मा टॉलस्टॉय यांची घरची स्थितीही फार चांगली होती. त्यांनीं आपल्या प्रपंचास सुरवात करतांनाच १६००० एकर जमीन खरेदी केली. ही वडिलार्जित इस्टेट तर मोठी होतीच; पण इतके श्रीमंत असल्यामुळें टॉलस्टॉय यांना साधु म्हणत नाहींत, तर साधुत्वाचे सर्व गुण त्यांचे आंगीं वसत होते. ते अत्यंत विद्वान् व त्याप्रमाणेंच विनयशीलही होते. अत्यंत साध्या रीतीनें वागून लोकसेवा करण्याकडे त्यांचा कल फार असे.

एकदां महात्मा टॉलस्टॉय प्रवासांत असतां एका रेल्वेस्टेशनवर प्लॅटफार्मवर फिरत होते. ते तिसऱ्या वर्गाच्या डब्यांतून प्रवास करीत. ते इकडे तिकडे फिरत असतां त्यांच्या अत्यंत साध्या पोषाखावरून हा कोणीतरी मजूर आहे असें वाटून फर्स्ट क्लासचे डब्यांत बसलेल्या एका बाईनें त्यांस बोलावलें व जवळच असलेल्या वेटिंगरूममध्यें—विश्रांतिगृहांत—बसलेल्या आपल्या पतीकडे पोंचविण्यासाठीं एक पुस्तक त्यांचे हातीं देऊन या कामगिरीसाठीं दोन आणेही त्यांना देऊन टाकले. टॉलस्टायांनीं ते पैसे खिशांत ठेवले व त्या बाईनीं सांगितलेली कामगिरी बजावून ते पुन्हाः प्लॅटफार्मवर येऊन उभे राहिले. इतक्यांत दुसऱ्या एका फर्स्ट क्लासच्या डब्यांत बसलेल्या गृहस्थांनीं त्यांना ओळखलें व ते

गृहस्थ खालीं उतरून अदबीनें टॉलस्टॉय यांचे जवळ येऊन बोलूं लागले. त्यांचे तोंडून कौंट, कौंट हे शब्द वरचेवर निघालेले पाहून त्या श्रीमंत बाईला आश्चर्य वाटलें व तिनें हे गृहस्थ कोण आहेत याची चौकशी केली. ते कौंट टॉलस्टॉय आहेत हें कळतांच तिला फार वाईट वाटलें व तिनें डब्यांतून उतरून त्यांची क्षमा मागितली आणि ते दोन आणेही परत मागितले. टॉलस्टॉय म्हणाले, ' क्षमा मागण्याचें कांहीं कारण नाहीं. मीं आपली कामगिरी केली यांत विशेष तें काय केलें ? आणि आपण पैसे परत कां मागतां ! ते माझ्या मजुरीचे पैसे आहेत !'

---

## बाळ, टॉलस्टॉय केव्हां येणार आहेत ?



[ ६ ]

महात्मा कौंट टॉलस्टॉय हे किती साध्या रीतीनें वागत असत, तें आणखी एका गोष्टीवरून चांगलें कळून येण्यासारखें आहे. टॉलस्टॉय यांनीं एक गरीब मुलगा घरीं पाळलेला होता. त्याला शिकविण्यासाठीं त्यांनीं एका गांवीं ठेवलेला होता. या गांवच्या विद्यालयांत तो अभ्यास करीत असे. एकदां या विद्यार्थ्याला भेटण्याची इच्छा झाल्यामुळें टॉलस्टॉय यांनीं त्यास आपण केव्हां येऊं तें पत्र पाठवून कळवून ठेवलें होतें. त्या शाळेच्या चालकांस कौंट टॉलस्टॉय येणार आहेत हें कळतांच त्यांनीं त्यांच्या स्वागताची तयारी करून ते वाट पहात राहिले. ठरलेल्या वेळीं शेतकऱ्याच्या पोषाखांत एक म्हातारा गृहस्थ आला व त्यानें त्या विद्यालयाचे शिपायाकडे चौकशी करून त्या मुलाची भेट घेऊन तो परतही गेला. विद्यालयाचे चालक टॉलस्टॉय यांची वाट पाहात उभेच होते.

वेळ टळून गेली तरी ते आले नाहींत. तेव्हां त्यांनीं त्या मुलाकडे चौकशी केली. त्याला बोलावून ते म्हणाले, 'बाळ, टॉलस्टॉय केव्हां येणार आहेत?' त्यावर तो मुलगा आश्चर्यचकित होऊन म्हणाला, 'ते तर मघांच येऊन गेले!' मुलाचें हें उत्तर ऐकून विद्यालयाचे चालक जास्तच गोंधळून गेले व केव्हां आले होते, त्यांचा पोषाख कसा होता, ते आपणांस कसे दिसले नाहींत वगैरे म्हणूं लागले. मुलानें सर्व माहिती देतांच त्यांना कळून आलें कीं, मघां शेतकऱ्याच्या वेषांत आलेले म्हातारे गृहस्थ म्हणजेच टॉलस्टॉय होत. या थोर गृहस्थांचे भेटीस आपण अंतरलों म्हणून त्यांना फार वाईट वाटूं लागलें.

---

# माझें असमाधान नाहींसें व्हावें म्हणून मीं मदत केली.



[ ७ ]

एकदां अमेरिकेचे प्रेसिडेंटसाहेब सर एब्राहम लिंकन हे आपल्या दरबारला निघाले असतां, रस्त्याला एके ठिकाणीं एक डुक्कर चिखलांत अडकून पडलेलें त्यांना दिसलें. चिखलांतून बाहेर निघावें म्हणून तें डुक्कर सारखी धडपड करीत होतें पण त्याला वर कांहीं निघतां येईना. त्याची ती धडपड पाहून लिंकनसाहेबांना कळवळा आला. ते आपल्या गाडींतून खालीं उतरले व त्यांनीं स्वतः जाऊन त्या डुकराला धरून वर काढलें. त्यांच्याबरोबर शिपाई होते, पण त्यांना हें काम त्यांनीं सांगितलेंच नाहीं. त्या डुकराला वर काढतांना चिखल आंगावर उडून त्यांचे कपडेही थोडे खराब झाले; पण त्याची पर्वा न करितां ते गाडींत बसून तसेच दरबारला गेले. तेथें त्यांचेपूर्वीं प्रधान मंडळी व इतर अधिकारी

लोक येऊन बसलेले होतेच. त्यांनीं उठून उभे राहून लिंकनसाहेबांना सलामी दिली व ते आपले जागेवर बसले. पण आज प्रेसिडेंटसाहेबांचे कपडे थोडे खराब पाहून त्या प्रधान मंडळींनीं शिपयांकडे चौकशी केली. तेव्हां त्यांना खरा प्रकार समजला. अमेरिकेच्या प्रेसिडेंटानें स्वतः जाऊन त्या डुकराला वर काढल्याचें ऐकून प्रधानास व इतर सर्व लोकांस आश्चर्य वाटलें व त्यांच्या दयाळूपणाबद्दल त्यांनीं प्रेसिडेंटसाहेबांची स्तुति केली. अमेरिकेचे हे प्रेसिडेंट म्हणजे तेथील राजे. त्यांनीं हुकूम केला असतां सर्व देश वाटेल तें करण्यास तयार होण्यासारखी स्थिति असतां, स्वतः आपल्या हातांनीं त्यांनीं त्या डुकराला वर काढल्याचें ऐकून लोकांना आश्चर्य वाटणें व त्यांच्या दयाळूपणाबद्दल लोकांनीं त्यांची स्तुति करणें साहाजिक आहे. लोकांची स्तुति ऐकून लिंकनसाहेब म्हणाले, " मित्रांनो, माझी स्तुति कांहीं करूं नका. त्या डुकरावर दया करावी म्हणून मीं कांहीं त्यास वर काढलें नाहीं. त्याच्या हालअपेष्टा पाहून मला फार वाईट वाटलें व तें माझें असमाधान नाहींसें व्हावें म्हणून मीं त्यास मदत केली ! "

---

## मी त्याला अधिक सभ्य होऊं देऊं काय ?

[ ८ ]

अमेरिकेचे पहिले प्रेसिडेंट प्रसिद्ध जॉर्ज वॉशिंग्टनसाहेब एकदां रस्त्यानें फिरावयास जात असतां एका—निग्रो जातीच्या मनुष्यानें त्यांना सलाम केला. त्याबरोबर वॉशिंग्टनसाहेबांनींहि उलट त्यास सलाम केला. प्रेसिडेंट साहेबांचें हें वर्तन पाहून त्यांचेबरोबर असलेल्या गोऱ्या लोकांना फार वाईट वाटलें. निग्रो लोक काळ्या वर्णाचे असून अमेरिकेंत त्यांना फार हलक्या दर्जाचे मानतात. आपल्या इकडील अस्पृश्य मानलेल्या

लोकांपेक्षांही त्याची किंमत तिकडे कमी मानतात. तेव्हां अशा कमी दर्जाच्या एकाद्या माणसानें सलाम केला असतां, त्यास उलट सलाम करणें हें गोरे लोक अपमानकारक मानतात. ते समजतात कीं, काळ्या लोकांनीं आपणांस सलाम करणें हें त्यांचें कर्तव्यच आहे; आपण त्यांना उलट सलाम करण्याचें कारण नाहीं.' जॉर्ज वॉशिंग्टन यांच्याबरोबर असलेल्या एका गोऱ्या गृहस्थानें या त्यांच्या वर्तनाबद्दल कानउघाडणी केली. तेव्हां ते म्हणाले, ' मी त्याला मजपेक्षां अधिक सभ्य होऊं देऊं काय ? '

एकाद्यानें दुसऱ्यास सलाम करणें हें संभावितपणाचें लक्षण आहे. निग्रो गृहस्थानें सलाम करून संभावितपणा दाखविला असतां त्याला उलट सलाम केला नाहीं तर तो न करणारा असभ्य ठरणार नाहीं काय ? जॉर्ज वॉशिंग्टनसारख्या थोर गृहस्थाच्या लक्षांत ही गोष्ट आल्याशिवाय कशी राहील ? 'खरें बोलणारा मुलगा जॉर्ज वॉशिंग्टन' म्हणून ज्याची माहिती क्रमिक तिसऱ्या पुस्तकांत दिलेली आहे तेच हे गृहस्थ जॉर्ज वॉशिंग्टन होत. ते आपल्या थोरपणानें एवढ्या योग्यतेस चढले कीं, अमेरिका देशानें त्यांस आपले पहिले प्रेसिडेंट निवडून त्यांचा बहुमान केला.

---

## हे तुमचे उपकारच आहेत.



[ ९ ]

महाराष्ट्रांतील प्रसिद्ध साधुपुरुष एकनाथ हे फार सहनशील होते. त्यांना राग आणण्याचा कोणी कसाही प्रयत्न केला तरी त्याला त्यांत यश येत नसे. एकनाथांची ही कीर्ति साऱ्या पैठण गांवांत पसरलेली होती. एकदां एका तांबोळ्याच्या मनांत महाराजांची परीक्षा पाहण्याचें आलें व त्यानें एके दिवशीं त्यांना राग आणण्याचा निश्चय केला. एक-

नाथमहाराज रोज सकाळीं स्नान करून स्तोत्र-पाठ करीत घरीं येत असत. त्यांचा जाण्यायेण्याचा मार्ग या तांबोळ्याचे दुकानावरूनच होता. एके दिवशीं नित्याप्रमाणें स्नान करून एकनाथमहाराज घरीं येत असतां आपल्या दुकानापुढें आलेले पाहून त्या तांबोळ्यानें पानतंबाखू खाऊन त्यांचे आंगावर चूळ थुंकली. महाराज कांहीं बोलले नाहींत. ते परत नदीवर गेले आणि पुन्हा स्नान करून स्तोत्र-पाठ करीत घरीं येऊं लागले. ते दुकानापुढें येतांच पुन्हा त्या तांबोळ्यानें त्यांचे आंगावर चूळ टाकली ! पुन्हा एकनाथमहाराज नदीस जाऊन स्नान करून आले. आतां ही त्यांची तिसरी खेप होती. या खेपेसही त्या तांबोळ्यानें पुन्हा चूळ टाकली ! तरी एकनाथमहाराजांच्या मनाची शांतता ढळली नाहीं. ते पुन्हा नदीस जाऊन स्नान करून आले व स्तोत्र-पाठ करीत घरीं चालले. आतां मात्र त्या तांबोळ्यास पश्चात्ताप झाला. या साधुपुरुषास आपण निष्कारण त्रास दिला म्हणून त्यास वाईट वाटलें. या खेपेस एकनाथमहाराज त्याचे दुकानापुढें येतांच त्यानें त्यांचेपुढें लोटांगण घातलें व केलेल्या अपराधाची क्षमा मागितली. तेव्हां एकनाथमहाराज म्हणाले, " तुमचा अपराध कोणता आहे ? कशाबद्दल तुम्हांला क्षमा करावयाची ? उलट, ' हे तुमचे उपकारच आहेत ! ' रोज मला एक वेळ गंगेचें स्नान घडत असे तें आज तीन वेळां घडलें आणि रोजच्यापेक्षां जास्त वेळ स्तोत्र-पाठ करून देवध्यान करण्यांत गेला. याबद्दल मीं तुमचे उपकार मानावयास नकोत काय ?

---

## लोकांना आश्चर्य वाटलें !

[ १० ]

मुसलमानी धर्माचे संस्थापक पैगंबर महंमदसाहेब हे एकदां मदीनेस असतां सायंकाळचे वेळीं फिरावयास गेलेले होते. त्यावेळीं त्यांनीं बरो-

बर कोणी घेतलेलें नव्हतें. ते एकटेच गेलेले होते. फिरून परत येत असतां रस्त्यांत एके ठिकाणीं एक म्हातारी बाई सरपणाची एक मोळी खालीं टाकून दमूनभागून बसलेली त्यांना दिसली. पैगंबरसाहेब जवळ आले तेव्हां तिनें त्यांस ओळखलें नाहीं. हा कोणी तरी सामान्य मनुष्यच आहे असें वाटून ती त्यांस म्हणाली, 'बाबा, एवढी मोळी उचलूं लागतोस का ?' म्हातारीची ती एकंदर स्थिति पाहून पैगंबरसाहेबांचे मनांत सहानुभूति उत्पन्न झाली व त्यांनीं त्या बाईला तिची माहिती विचारली. बाई म्हणाली, 'मी एक गरीब मोलकरीण आहें. घरीं दोन लहान मुलें आहेत, मी विधवा आहें. मी थोडें मिळवीन तरच त्यांस खावयास मिळतें. आज रानांत लांकडें गोळा करण्यास वेळ झाला. लवकर गांवांत गेलें नाहीं तर पैसे मिळणार नाहींत म्हणून काळजी करीत बसलें आहें. ओझें तर बरेंच आहे आणि म्हातारपणामुळें तें नेण्यास त्रास होत आहे म्हणून एथें टाकून बसलें आहें. मी रोज एवढी मोळी एका शेटजीकडे नेऊन देतें. तो तिची किंमत देतो. मग तांदूळ घेऊन मी घरीं जातें व मुलांना खाऊं घालतें.' पैगंबरसाहेबांनीं ही हकिकत ऐकली तेव्हां त्यांना कळवळा आला व त्यांनीं स्वतः ती मोळी आपले डोक्यावर घेऊन त्या बाईनें सांगितलेल्या ठिकाणीं नेऊन टाकली. बाईनें त्यांस दुवा दिला. मोळी टाकून पैगंबरसाहेब आपले घरीं निघून गेले.

दुसरे दिवशीं पैगंबरसाहेबांनीं त्या मोलकरणीस आपले घरीं बोलावून घेतलें व तिच्या पोटापाण्याची कायमची व्यवस्था करून टाकली. काल आपलें ओझें अणणारे गृहस्थ दुसरे तिसरे कोणी नसून हजरत महंमदसाहेब आहेत असें पाहून त्या बाईस आपण यांना काम सांगितल्याबद्दल वाईट वाटलें. शेवटीं, 'ईश्वर तुमचें कल्याण करो' असा आशीर्वाद देऊन ती बाई आपले घरीं गेली. मदीना शहरांत जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां सर्व लोकांना आश्चर्य वाटलें.

---

# देवा, यांजवर दया कर.



[ ११ ]

ख्रिस्ती धर्माची स्थापना करणारे थोर गृहस्थ भगवान् येशुख्रिस्त हे होत. नवीन कोणताही धर्म स्थापन करावयाचा म्हणजे फार कठीण काम असतें. लोकांच्या भावना सर्व बदलाव्या लागतात, आणि त्यामुळें असे नवीन विचार सांगणाऱ्या लोकांना अत्यंत त्रास सोसावा लागतो. त्यांचा छळ होतो. लोक त्यांना पुरें पुरें करून सोडतात. येशुख्रिस्तही नवीन धर्मसंस्थापकच होते म्हणून त्यांनाही अत्यंत छळ सोसावा लागला. लोकांनीं त्यांना फार त्रास दिला. शेवटीं सुळावर चढवून ठार मारलें. यहुदी धर्माच्या लोकांना येशुख्रिस्तांचे नवीन विचार पटेनासे झाले व त्यांनीं त्यांस हें नवीन धर्मप्रसार करण्याचें वेड सोडून देण्यास सांगितलें. पण येशुख्रिस्तांनीं त्यांच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं. शेवटीं त्या लोकांनीं येशुख्रिस्तांस पकडून सुळावर चढविलें. एक † अशा आकाराचा क्रूस तयार केला व त्यास चिकटून त्यांना उभें करून त्यांच्या आंगांत खिळे ठोंचून त्यांचा प्राण घेतला ! पण हालअपेष्टा होत असतांही त्या थोर महात्म्याच्या चर्येंत फरक पडला नाहीं. अखेरपर्यंत त्यांचा चेहरा नेहमींप्रमाणें आनंदीच दिसत होता. आपल्या शत्रूंचा सूड उगविण्याचेंही त्यांचे मनांत आलें नाहीं. उलट, मरतेवेळीं त्यांनीं देवाची प्रार्थना केली कीं, ‘ देवा, या लोकांना चांगलें कोणतें, वाईट कोणतें हें कळत नसल्यामुळें त्यांचे हातून हें कृत्य घडलेलें आहे, तरी यांना या कृत्याबद्दल शासन करूं नकोस. देवा, यांजवर दया कर ! ’ थोर पुरुषांचा थोरपणा कशांत असतो हें महात्मा येशुख्रिस्तांनीं जगाला दाखविलें !

# ही घे तुला हवी तर !

[ १२ ]

अलीकडच्या काळांत होऊन गेलेले एक थोर पुरुष श्रीमत् स्वामी विवेकानंद हे हिंदुस्थान देशांत प्रवास करीत हिंडत असतां एकदां म्हैसूर संस्थानांत गेलेले होते. म्हैसूरच्या महाराजांनीं व दिवाणजींनीं बरेच दिवस स्वामीजींना ठेवून घेतलें होतें. शेवटीं जेव्हां स्वामीजी जावयास निघाले तेव्हां त्यांस कांहीं तरी दक्षिणा देण्याचा म्हैसूरच्या महाराजांनीं बेत केला; पण विवेकानंदजी दक्षिणा म्हणून कांहीं घेत नाहींत असें जेव्हां त्यांना कळलें, तेव्हां त्यांनीं स्वामीजीसाठीं चंदनाच्या लाकडाची व सुंदर नकशी केलेली एक गुडगुडी तयार केली, व ती त्यांस सप्रेम अर्पण केली. बंगाल्यांतील रिवाजाप्रमाणें स्वामीजी केव्हां केव्हां तंबाखू ओढीत, म्हणून त्यांनींही या देणगीचा स्वीकार केला. नंतर स्वामीजी मद्रासला एका विद्वान् व श्रीमान् गृहस्थांच्या घरीं जाऊन राहिले. तेथें त्यांचा मुक्काम थोडेच दिवस होता. एकदां त्या श्रीमान् गृहस्थांच्या स्वयंपाक्याची नजर स्वामी विवेकानंदाच्या गुडगुडीकडे गेली. तो आचारी तंबाखूचा एकनिष्ठ भक्त असल्यामुळें त्यास तिच्याबद्दल लोभ सुटला. स्वामीजींच्या नजरेस ही गोष्ट आली. लगेच त्यांनीं त्या आचाऱ्यास जवळ बोलाविलें व त्यानें न मागतांच ती गुडगुडी 'ही घे तुला हवी तर' म्हणून त्यास देऊन टाकली !

स्वामी विवेकानंदजी सर्वधर्मपरिषदेसाठीं अमेरिकेस गेले असतां तेथेंही एकदां असाच प्रसंग आला. स्वामीजींची हातांत धरावयाची एक चांगली काठी होती. सर्व हिंदुस्थानाचा स्वामीजींनीं प्रवास केला, तेव्हां ही काठी त्यांचेबरोबर होती. अर्थात् ती त्यांच्या आवडीची होती; पण अमेरिकेंतील

एका गृहस्थास ही काठी आपल्या हातांत असावी असें वाटूं लागलें. ही त्या गृहस्थाची इच्छा स्वामीजींस कळतांच ती त्यांनीं त्यास देऊन टाकली ! त्या लहानशा काठीची किंमत नाहीं, पण आपल्या अत्यंत आवडीची वस्तु दुसऱ्यास देऊन टाकण्यास मनाचा थोरपणा लागतो.

---

## देवानें तुला राजा केलें असतें तर बरें झालें असतें.

[ १२ ]

हजरत पैगंबर महंमदसाहेबांच्या मागून जे थोर पुरुष खलीफा झालेले होते, त्यांत हजरत उमरसाहेब यांचीही प्रामुख्यानें गणना होते. उमरसाहेब मुसलमानी धर्माचे खलीफा होते, अर्थात् ते धर्मगुरु तर होतेच पण राजेही होते. त्यांची वागणूक अत्यंत साधी होती व त्यांचें अंतःकरण फार दयाळू होतें.

एके दिवशीं रात्रीं आपल्या शहरची कशी काय स्थिति आहे हें पाहण्यासाठीं खलीफा उमरसाहेब एका नोकरासह वेष पालटून हिंडत होते. मध्यरात्र झालेली होती. सर्व शहरांतून हिंडत ते बाहेरचे बाजूस आले, तों त्यांचे नजरेस थोड्या अंतरावर जाळ दिसला; म्हणून काय आहे तें पाहण्यासाठीं ते त्या जाळाकडे गेले. तेथें एक बाई एका मडक्याखालीं जाळ लावून बसलेली आहे व तिचीं दोन मुलें रडत पडलेलीं आहेत असें दिसलें. हजरत उमरसाहेबांनीं त्या बाईस इतक्या रात्रीं तूं हें काय करीत आहेस व हीं मुलें कां रडत आहेत म्हणून विचारलें. तेव्हां ती म्हणाली, ‘ काय करूं बाबा ? आज दिवसभर हिंडलें पण

शहरांत काम मिळालें नाहीं व त्यामुळें या मुलांचें पोट भरण्यास अन्नही मिळालें नाहीं. सकाळपासून त्यांना खावयास कांहीं न मिळाल्यामुळें तीं रडत आहेत व त्यांची उगीच कांहीं तरी समजूत करण्यासाठीं मी चुलीवर रिकामेंच मडकें ठेवून खालीं जाळ लावून बसलें आहें. कोणीकडून तरी वेळ मारून नेत आहें. मुलांना आतां भात होईल असें वाटत असल्यामुळें त्यांचें रडूं आतां कमी झालें आहे!' उमरसाहेब म्हणाले, 'एथील खलीफा तुझी दाद घेत नाहींत काय?' तेव्हां बाई म्हणाली, 'माझी गरिबाची स्थिति त्यांना कळणार तरी कशी? आणि मग ते दाद तरी कसले घेणार?' त्या बाईची व तिच्या मुलांची ती स्थिति पाहून उमरसाहेबांना फार वाईट वाटलें. ते परत फिरले आणि आपल्या धान्याच्या कोठींतून एक तांदळाचें पोतें काढून तें पाठीवर उचलून देण्यास नोकरास त्यांनीं सांगितलें. नोकर म्हणाला, 'महाराज, मी नेतों.' पण त्यांनीं त्यांचें ऐकलें नाहीं, ते म्हणाले, 'माझी प्रजा इतक्या हालांत दिवस काढीत असतां मी चैनींत राहूं काय? तूं पोतें उचलून माझे पाठीवर ठेव' शेवटीं त्यानें तसें केलें. मग तेथून तें पोतें उमरसाहेबांनीं त्या बाईकडे नेलें व त्यांतील तांदूळ काढून शिजविण्यास बाईस सांगितलें. आपणही जाळ लावण्यास मदत केली. लवकरच भात तयार झाला व त्या गरीब बाईचीं मुलें जेवून तृप्त झालीं. त्या बाईलाही जेवूं घातलें व मग तिचा निरोप घेऊन ते जाण्यास निघाले. जातांना त्या बाईनें अत्यंत कृतज्ञतेनें त्यांचे उपकार मानले व देवाजवळ त्यांस सुखी ठेवण्याबद्दल प्रार्थना केली. शेवटीं ती म्हणाली, 'उमरच्या ऐवजीं देवानें तुला राजा केलें असतें तर बरें झालें असतें.'

---

# हिच्या पोटीं जन्मलों असतों तर मीही असाच सुंदर दिसलों असतों.

[ १४ ]

श्रीशिवाजीमहाराजांनीं मुसलमानांपासून आपलें महाराष्ट्राचें राज्य परत मिळविण्याचा प्रयत्न सुरू केला असतां घडलेली एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. या गोष्टीवरून थोरांच्या आंगीं थोरपणा कसा असतो हें चांगलें दिसून येईल.

शिवाजी–महाराजांचे लहानपणाचे जोडीदार आबाजी सोनदेव व नेताजी पालकर यांनीं विजापूरकरांचे ताब्यांतील कल्याणप्रांत जिंकण्यासाठीं त्याच्यावर स्वारी केली व पुष्कळ लूट मिळविली. मुसलमानांचा खजिनाही लुटला. या कल्याण प्रांताचा सुभेदार मुसलमान होता. त्याची बायको अत्यंत सुंदर स्त्री होती तीही या लुटीच्या प्रसंगीं मराठा सरदारांचे हातीं लागली. त्यांनीं तिला आपल्या महाराजांस–श्रीशिवरायांस–अर्पण करण्याकरितां बरोबर घेतली व शिवाजीमहाराज जेथें होते तेथें जाऊन लुटीचा सर्व वृत्तान्त कळविला व नजराणा म्हणून ती स्त्री पुढें आणली. आपल्या सरदारांचा पराक्रम पाहून शिवाजीमहाराजांना संतोष झाला. केलेल्या कामगिरीबद्दल त्यांनीं त्यांना शाबासकी दिली व त्या प्रांतांचे सुभेदारही नेमलें. पण नजराणा म्हणून जो पदार्थ शिवाजीमहाराजांचे पुढें आला होता त्यांबद्दल त्यांना अत्यंत वाईट वाटलें. ती स्त्री तरुण असून अत्यंत रूपवान होती आणि शिवरायांचें वय यावेळीं १८।२० वर्षांचें होतें तरी त्यांनीं या नजराण्याचा स्वीकार केला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या स्त्रीच्या सौंदर्याकडे पाहून, ‘ हिच्या पोटीं जन्मलों असतों तर मीही असाच सुंदर दिसलों असतों ’ असे उद्गार काढले! अर्थात

तिला आपल्या मातेसमान मानलें व चोळीलुगडें करून मोठ्या इतमामानें तिला तिच्या नवऱ्याकडे पाठवून दिली !

---

# लोक कोणाला थोर समजतात ?



[ १५ ]

एकदां एक तळें आणि नदी यांच्यांत एक मजेदार संवाद झाला. नुकताच पावसाळा संपलेला होता. तळें पाण्यानें तुडुंब भरलेलें होतें. नदींतही पाणी बरेंच होतें, पण तिला आलेला पूर ओसरलेला होता. यावेळीं तळें वैभवसंपन्न असल्यामुळें त्याला फार घमेंड वाटत होती. थोडया अंतरावरूनच नदी वाहात असल्यामुळें तिला तें यावेळीं हिणवीत होतें. पुष्कळ पाण्याचा पुरवठा असल्यामुळें त्याला गर्व होणें साहाजिक होतें. तळें नदीला उद्देशून म्हणालें, ' तूं माझ्यापुढें अगदीं क्षुद्र दिसते आहेस. काय तुझ्यामध्यें एक पुरुषभरसुद्धां पाणी असूं नये ? ' नदीनें यावेळीं त्याला कांहींच उत्तर केलें नाहीं.

सुमारें चारपांच महिने होऊन गेले. उन्हाळ्याचा ताप वाढूं लागला. चोहोंकडे रखरख भासूं लागली. यावेळीं त्या तळ्याची स्थिति अगदीं पाहाण्यासारखी झाली होती. त्याच्यांतील पाणी बहुतेक सगळें आटत आलें होतें. जें थोडेंसें होतें त्यासही घाण सुटली होती, जनावरेंसुद्धां त्याच्याकडे पहात नव्हतीं. यावेळीं नदीस गुडघ्यामांडयाइतकेंच पाणी वाहात होतें; पण तें अत्यंत चवदार असून स्वच्छही दिसत होतें. ' हर-गंगे भगीरथी ' म्हणून लोक तिच्या पाण्यानें स्नान करीत होते आणि पिण्यास व धुण्यास तर तें पूर्वींप्रमाणेंच उपयोगीं पडत होतें. या नदीला लोक फार पवित्र मानीत होते. सणावाराला आणि इतर चांगल्या दिवशीं

दूरदूरचे लोक नदीच्या दर्शनास येत. नदीची ही स्थिति पाहून त्या तळ्याला स्वतःबद्दल वाईट वाटत होतें. त्याची घमेंड पूर्णपणें नाहींशी झाली होती. तें नदीला म्हणालें, 'ताई, हें असें कसें झालें ? माझें सर्व वैभव गेलें आणि तुझी तर दिवसेंदिवस चलतीच चालली आहे असें कसें झालें ?' नदी म्हणाली, 'भाऊ, याचें कारण हेंच कीं, मी अगदीं आरंभापासून दुसऱ्याच्या हिताकडे लक्ष देत आलें आहें. एका जागीं पाणी सांठवून मी अप्पलपोटेपणा कधींच केला नाहीं. मी नेहमीं उदारपणानें माझें पाणी दुसऱ्यास देत जात आहें. तूं मात्र सर्व पाणी एका ठिकाणीं सांठवून अप्पलपोटेपणा केलास. दुसऱ्याच्या उपयोगासाठीं तें पुढें वाहूं दिलें नाहींस. मी तसें करीत नाहीं. मी माझें सर्व पाणी दुसऱ्यास देतें. यामुळें देव मला नेहमीं पाण्याचा पुरवठा करीत असतो. आतां लोक कोणाला थोर समजतात, आणि ते तसें कां समजतात हें तुला सांगावयास नकोच.' पुढच्या सालापासून तळ्यानें एक पाट वाहूं दिला. पुढें सुंदर सरोवर असें नांव त्यास देवदयेनें मिळालें.

---

## मी आज खेळ पहावयास येत नाहीं.



[ १६ ]

थोर माणसें म्हणून आपण ज्यांना समजतों, त्यांना थोरपणा एकदम येत नाहीं. थोरपणाला लागणारे गुण लहानपणापासूनच त्यांचे ठायीं दिसून येत असतात. श्रीमत् स्वामी विवेकानंद हे एक आपल्या देशांत थोर पुरुष होऊन गेले. त्यांच्या लहानपणची एक गोष्ट प्रसिद्ध आहे. एकदां ते आपल्या कांहीं मित्रमंडळीसह—अर्थात् कांहीं मुलांच्या बरोबर— एक खेळ पाहण्यासाठीं म्हणून जात होते. खेळ फार चांगला होणार

होता आणि दिवसही सुट्टीचा होता. या मुलाच्या राहत्या घरापासून तो थोडा दूर होता तरी पण सर्व मुलें खेळीमेळीनें चालत होतीं. विवेकानंदांचें लहानपणचें नांव नरेंद्र असें होतें. सोबती त्याला नोरेन् असें म्हणत. घरापासून कांहीं अंतरावर ( कलकत्ता शहरांतील ही गोष्ट आहे. ) गेल्यावर नोरेनच्या मित्रांपैकीं एकाला एकाएकीं थंडी वाजून येऊन ताप भरूं लागला. मुलगा अगदीं गळून गेला. त्याच्यानें पुढें चालवेना. तेव्हां सर्व मुलांना विचार पडला. खेळ पाहण्यास जाण्याला सर्वजण अगदीं उत्सुक झालेले, आणि एक मित्र तर असा आजारी झालेला. त्याला त्यावेळीं सोडून जाणें धोक्याचें आहे असें जाणून नरेंद्र आपल्या मित्रमंडळीस म्हणाला कीं, ' मित्रांनो, तुम्ही सर्वजण पुढें चला. खेळास सुरवात झाली असेल. मी आतां ह्याला त्याच्या घरीं पोहोंचवितों. मी आज खेळ पाहावयास येत नाहीं. ' नरेंद्राचा विचार सर्वांना पसंत पडला. नरेंद्र व तो आजारी मुलगा यांचेशिवाय बाकीचीं मुलें खेळ पाहाण्यास गेलीं. नरेंद्रानें एक भाड्याचा तांगा केला व आपल्या आजारी मित्रास त्याचे घरीं नेऊन पोहोंचतें केलें ! मित्रासाठीं खेळ पाहण्याची हौस त्याला आंवरून धरावी लागली. खरेंच आहे:—

जो एकरूप सुखदुःखपणीं गडी ते ॥

---

## हें पव्हरीबाबांच्या कृपेचें फळ.



[ १७ ]

गंगानदीच्या कांठीं गाजीपूर म्हणून एक शहर आहे. तेथें पव्हरी-बाबा म्हणून एक साधु राहात होते. ते थोडे दिवसांपूर्वीच समाधिस्थ झाले. ते उत्तम तऱ्हेचे साधुपुरुष होते म्हणून पुष्कळ थोर थोर माण-

सेंही त्यांचे दर्शनास येत. श्री स्वामी विवेकानंदही वरचेवर त्यांचे दर्शनास जात. हे साधु नदीकांठच्या एका गुहेंत राहत व बहुधा कांहीं खात नसत. केव्हांतरी थोड्या मिरच्या व उकडलेले बटाटे मात्र खात. त्यामुळें लोकांनीं त्यांचें नांव पव्हरी ( पवनाहारी—वायु भक्षण करून राहाणारा ) बाबा असें ठेविलें होतें. या साधूजवळ पैसाआडका पुष्कळ असावा आणि त्याचे रक्षणासाठीं हे या गुहेंत राहात असावेत व कधीं फारसे बाहेर येत नसावेत असा संशय येणाऱ्या एका गृहस्थानें एकदां या साधूंच्या गुहेंत जाऊन चोरी करण्याचें ठरविलें. पव्हरीबाबा गुहेंतून बाहेर पडून स्नानास गेलेले पाहतांच या गृहस्थानें गुहेंत प्रवेश केला, आणि आंत जाऊन त्यानें पुष्कळ शोध केला पण त्याला कांहीं सांपडेना. शेवटीं कसलेंसें एक बोंचकें त्याचे हातीं लागलें. यांतच बाबांचें द्रव्य असावें असें वाटून तें बोंचकें घेऊन तो बाहेर आला व त्यानें शहरचा रस्ता धरला. इतक्यांत पव्हरीबाबा स्नान करून आले. त्यांना पाहतांच त्या चोरानें पळण्यास सुरवात केली. साधूही हा गृहस्थ कां आला होता तें विचारण्यासाठीं त्याचेमागून पळूं लागले. चोरानें आतां हे गांठणार असें समजून गांठोडें टाकून पळण्यास सुरवात केली. पव्हरीबाबांनीं हें गांठोडें उचलून घेऊन जोरानें धूम ठोकली व चोरास पकडलें. चोर लटलटां कांपूं लागला व अपराधाची क्षमा मागूं लागला; पण पव्हरीबाबा म्हणाले, ‘ घाबरूं नकोस, मी तुला कांहीं करीत नाहीं. उलट हें गांठोडें मी तुला देण्यासाठीं धांवत आलों आहें. ज्या अर्थीं या गांठोड्यासाठीं तूं इतकी तसदी घेतली आहेस त्या अर्थीं याची तुला मजपेक्षां जास्त गरज आहे. तर हें तूं घे. ’ चोर हें ऐकून आश्चर्यचकित झाला. नाइलाजानें त्यानें गांठोडें घेतलें. उघडून पाहातां आंत फाटक्या कपड्यांखेरीज कांहीं आढळलें नाहीं. पुढें त्या चोरास चांगला पश्चात्ताप झाला व तो पुढें पव्हरीबाबांचा शिष्य होऊन मोठा साधुपुरुष होऊन

गेला. या साधूची आणि स्वामी विवेकानंदांची गांठ हिमालयांत पडली असतां त्यानेंच ही गोष्ट सांगितली, व पव्हरीबाबांच्या थोरपणाचें वर्णन करून आपण ह्या स्थितीस पोंचलों हें पव्हरीबाबांच्या कृपेचें फळ होय असें सांगितलें.

---

# धन्य नागमहाशय !



[ १८ ]

श्रीरामकृष्ण परमहंसांचे शिष्य श्री नागमहाशय हे एक थोर पुरुष होते. त्यांच्या थोरपणाची एक गोष्ट प्रसिद्ध आहे ती अशी:—

एक वेळ पालबाबूंच्या निमंत्रणावरून ते भोगेश्वर येथें त्यांच्या भेटी-करितां गेले होते. तेथून परत निघण्याचे वेळीं कलकत्त्यापर्यंतचें बोटीचें भाडें ८ रुपये व एक कांबळें त्यांनीं नागमहाशयांस दिलें. भोगेश्वर-पासून तीन कोसांवर हांसकांदी येथें त्यावेळीं बोटीचें स्टेशन होतें. तेथें पोहोंचतांच नागमहाशय बोटीचें तिकीट घेण्याकरितां चालले असतां मध्येंच एक भिकारीण चार लहान मुलें घेऊन आपलें दुःख सांगून दीन स्वरानें त्यांच्याजवळ भिक्षा मागूं लागली. तिचा कातरस्वर ऐकून नागमहाशयांनीं पालबाबूंनीं दिलेले आठ रुपये व कांबळें त्या भिका-रणीला देऊन टाकलें, व म्हणाले, " आई, हें घेऊन स्वतःचें व आपल्या मुलाबाळांचें रक्षण कर जा. " त्यांनीं दिलेली भिक्षा हातांत पडतांच भिकारणीनें दोन्ही हात जोडून त्यांना आशीर्वाद दिला व मुलांसह दुसरीकडे निघून गेली. नागमहाशयांनीं नंतर थोडी विश्रांति घेऊन बोटीचा नाद सोडून देऊन पायींच कलकत्त्याची वाट धरली. रस्त्यांत एकादें देवालय दिसलें तर तेथें मिळेल तो प्रसाद खात;

नाहीं तर लाह्याफुटाणे घेऊन आपला मार्ग कापीत ! मोठी नदी किंवा नाला मध्यें लागला तर पार होण्यासाठीं नावेस एकदोन पैसे खर्च करून पार होत. अरुंद नाला असला तर स्वतःच पोहून पार होत ! त्यांच्या-जवळ निघतांना साडेसात आणे फक्त शिल्लक होते, त्यावरच भार ठेवून पायीं चालत चालत २९ व्या दिवशीं ते कलकत्त्यास येऊन पोंचले ! ! श्रीनागमहाशयांच्या प्रवासाची हकिकत लोकांना कळली तेव्हां ‘ धन्य नागमहाशय ’ असेच त्यांनीं उद्गार काढले. थोर साधुपुरुषांशिवाय असला उदारपणा कोणाचे ठिकाणीं दिसून येणार ?